**अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील अर्थसंकल्पीय कामकाजाशी संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना सुधारीत दराने मानधन मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०२५/प्र.क्र.३९/का.१४२६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ मार्च, २०२५.

**वाचा** :- १) नियोजन विभाग, शासन ज्ञापन क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.२/का.१४११, दि.१३/०१/२०२३.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेपुर-११२१/प्र.क्र.४/सेवा-९, दि.१३/०२/२०२३.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१०२३/प्र.क्र.१९३/प्रशासन-१, दि.२८/०४/२०२३.
४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.निविआ-२७२२/प्र.क्र.१००/का.१४२१, दि.५/०८/२०२४.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाने वाचा क्र. ३ येथील व नियोजन विभागाचे वाचा क्र.४ येथील शासन निर्णयान्वये सन २०२२-२३ या आर्थिक वर्षापासून अर्थसंकल्पीय कामकाजाशी संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना कराव्या लागणाऱ्या जादा कामासाठी अनुज्ञेय मानधनाच्या दरात सुधारणा केली आहे. त्याच धर्तीवर अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील इलेक्ट्रॉनिक आकडेवारी संस्करण केंद्र (इ.आ.सं) या कक्षेतील अर्थसंकल्पीय कामकाजाशी संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना वार्षिक अर्थसंकल्पातील अविभाज्य भाग असलेला वार्षिक कार्यक्रम तयार करणे व वित्त विभागाला त्याबाबतची आकडेवारी उपलब्ध करणे यासंबंधीच्या कराव्या लागणाऱ्या जादा कामासाठी देण्यात येणाऱ्या मानधनाच्या दरामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासनाने याबाबत आता असा निर्णय घेतला आहे की, अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील इलेक्ट्रॉनिक आकडेवारी संस्करण केंद्र (इ.आ.सं) या कक्षेतील अर्थसंकल्पीय कामकाजाशी संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना अर्थसंकल्पीय कामकाजाच्या अनुषंगाने कराव्या लागणाऱ्या जादा कामासाठी अनुज्ञेय मानधनाच्या दरात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | मानधनाचा दर |
|---|---|---|
| १ | अतिरिक्त संचालक/सह संचालक | रु.४०,०००/- |
| २ | उप संचालक | रु.२५,०००/- |
| ३ | संशोधन अधिकारी | रु.१७,०००/- |
| ४ | सहायक संशोधन अधिकारी/ सांख्यिकी सहायक | रु.१६,०००/- |
| ५ | शिपाई/नाईक | रु.८,०००/- |

२. मानधनाचे सुधारीत दर सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पापासून अंमलात येतील.

३. यासाठी ऑक्टोबर ते मार्च या सहा महिन्यांच्या कालावधीत अधिकारी/कर्मचारी यांची उपस्थिती किमान ७५% असणे अनिवार्य आहे. जर उपस्थिती ५०% असेल तर त्यानुसार ५०% रक्कम अनुज्ञेय राहील. उपरोक्त रक्कम ठोक रकमेच्या स्वरुपात देण्यात येईल.

४. “सदर अधिकारी/कर्मचारी यांनी आपले काम समाधानकारकपणे पार पाडले आहे” अशा संबंधित कक्षाच्या प्रभारी यांच्या प्रमाणपत्राच्या अधिन राहून सदर भत्ते मंजूर केले जातील.

५. या प्रयोजनावर होणारा खर्च “मागणी क्र.ओ-९, ३४५४, जनगणना सर्वेक्षण व सांख्यिकी, नियोजनाकरिता आकडेवारी (अनिवार्य) दत्तमत (३४५४०१३३), १३, कार्यालयीन खर्च” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.go.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०३२११४१३४७२४१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA
DEVENDRA
CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0CF60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2025.03.21 14:14:43 +05'30'

**(चारुशीला चौधरी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (ले.व अ.) व (लेखा परीक्षा), मुंबई-२०,
२. आयुक्त, अर्थ व सांख्यिकी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
४. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई,
५. सह सचिव/उप सचिव (सर्व), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
७. अवर सचिव/कक्ष अधिकारी (रोखशाखा/का.१४११/का.१४२१), नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई,
८. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. प्रधान सचिव (व्यय) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. निवड नस्ती, कार्यासन-१४२६.